**पुणे वनवृत्तातील ३ राजपत्रित व १ अराजपत्रित अशी एकूण ४ अस्थायी पदे दि.०१.१०.२०१८ ते दि.२८.०२.२०१९ पर्यंत पुढे चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक :- एफएसटी-०४/१६/प्र.क्र.११९/फ-४**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २४ ऑक्टोबर, २०१८

**वाचा** :- १) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे क्र.कक्ष-३/योजनेतर/प्र.क्र.३६/१७-१८/२३२८, दि.१४.०३.२०१८
२) शासन निर्णय क्र.एफएसटी-०४/१६/प्र.क्र.११९/फ-४, दि.१५.०३.२०१८
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि -२०१६ /प्र.क्र.८ /१६ /आ.पु.क., दि.०७.०९.२०१८
४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे क्र.कक्ष-३ /योजनेतर /प्र.क्र.१ /१८-१९ /११०१ /१८-१९, दि.२४.०९.२०१८.

**शासन निर्णय** :-

पुणे वनवृत्तातील ३ राजपत्रित व १ अराजपत्रित अशा एकूण ४ (चार) अस्थायी पदांना दि.०१.०३.२०१८ ते दि.३०.०९.२०१८ पर्यत संदर्भ क्रमांक-२ येथील शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यात आली होती.

२. पुणे वनवृत्तातील ४ अस्थायी पदांना दि.०१.१०.२०१८ ते दि.२८.०२.२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.४ अन्वये शासनास सादर केला आहे. आकृतिबंधातील एकूण २५०२५ पदांमध्ये या ४ अस्थायी पदांचा समावेश आहे.

३. उक्त परिस्थितीत पुणे वनवृत्तातील ४ अस्थायी पदांना दि.०१.१०.२०१८ ते दि.२८.०२.२०१९ पर्यत पुढे चालू ठेवण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे. सदर मंजूरी वित्त विभाग शासन निर्णय क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०७.०९.२०१८ मधील अटी व शर्तीच्या अधिन राहून देण्यात येत आहे. वित्त विभागाने सदर शासन निर्णयामध्ये दिलेल्या निर्णयानुसार विहित कालावधीत कार्यवाही करावी.

४. सदरहू पदावर होणारा खर्च हा खाली नमुद केलेल्या लेखाशिर्षाखाली दर्शविण्यात यावा व त्याखालील सन २०१८-२०१९ या वित्तीय वर्षात मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**मुख्य वनसंरक्षक व उपवनसंरक्षक यांच्या कार्यालयातील :- ३ पदे**

| | |
|---|---|
| **प्रधान शीर्ष** | २४०६ वनीकरण व वन्यजीवन (योजनेत्तर) |
| **उपप्रधान शीर्ष** | ०१ वनीकरण |
| **गौणशीर्ष** | ००१ संचालन व प्रशासन |
| | ०१ संचालन व प्रशासन |
| **उपशीर्ष** | (०१) (०२) प्रादेशिक वनसंरक्षक (२४०६ ००४२) ०१ वेतने |

**उपवनसंरक्षक यांचे कार्यालयातील :- १ पद**

| | |
|---|---|
| **प्रधान शीर्ष** | २४०६ वनीकरण व वन्यजीवन (योजनेत्तर) |
| **उपप्रधान शीर्ष** | ०१ वनीकरण |
| **गौणशीर्ष** | १०१ वनसंधारण विकास व पुनर्निर्मिती |
| | (०१) प्रशासन व संरक्षण |
| **उपशीर्ष** | (०१) (०१) प्रशासन व संरक्षण (२४०६ ००९६ ) ०१ वेतने |

५. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.पदनि २०१६ /प्र.क्र.८ /१६ /आ.पु.क., दि.०७.०९.२०१८ मधील तरतुदीनुसार विभागास असलेल्या प्राधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०२४१७४४०६४६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Babasaheb S. Shinde

Digitally signed by Babasaheb S. Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1706e7b903eb05a5f1c405f3795499452af658b876e10b223a0cef893b6b6689, cn=Babasaheb S. Shinde
Date: 2018.10.24 17:50:41 +05'30'

**(बा. सि. शिंदे)**
कक्ष अधिकारी
महसूल व वन विभाग

प्रति:-

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य-१/२ मुंबई/नागपूर.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

३) सर्व अप्पर प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४) मुख्य वनसंरक्षक (प्रा.), पुणे.
५) ब-१ कार्यासन, फ-२ कार्यासन, फ-८ कार्यासन, फ-७ कार्यासन, महसूल व वनविभाग, मंत्रालय-३२.
६) निवडनस्ती, फ-४ कार्यासन, महसूल व वनविभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

**शासन निर्णय महसूल व वन विभाग क्रमांक:- एफएसटी-०४/१६/प्र.क्र.११९/फ-४, दि.२४.१०.२०१८**

**विवरणपत्र "अ"**

## पुणे वनवृत्तातील २०१८-२०१९ मध्ये दि.०१.१०.२०१८ ते दि.२८.०२.२०१९ पर्यत पुढे चालू ठेवण्यात आलेली राजपत्रित व अराजपत्रित अस्थायी पदांची यादी

| अ. क्र. | कार्यालयाचे नांव व पदांचे नाव आणि वेतनश्रेणी | अस्थायी पदांची संख्या | स्तंभ क्रमांक ३ मधील पद/ पदे ज्या शासकीय आदेशान्वये निर्माण केली त्या आदेशाचा क्रमांक आणि दिनांक | स्तंभ क्र. ३ मधील पद/पदे २०१७-२०१८ यावर्षी ज्या शासकीय आदेशान्वये पुढे चालू ठेवली होती त्याचा क्रमांक आणि दिनांक |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | विभागीय वन अधिकारी (योजना) | १ | शा.नि.क्र.एफडीएम-१८००/१/फ-२, दिनांक २९.८.१९८२ | शा.नि.क्र.एफएसटी-०४/१६/ प्र.क्र.११९/फ-४, दि.१५.०३.२०१८ |
| २ | उपवनसंरक्षक | १ | शा.नि.क्र.एफडीएम-१०८४/१८४३१/सीआर-५४/फ-२, दि.३१.५.८४ | शा.नि.क्र.एफएसटी-०४/१६/ प्र.क्र.११९/फ-४, दि.१५.०३.२०१८ |
| ३ | सहायक वनसंरक्षक | १ | शा.नि.क्र.एफडीएम-१०८४/१८४३१/सीआर-५४/फ-२, दि.३१.५.८४ | शा.नि.क्र.एफएसटी-०४/१६/ प्र.क्र.११९/फ-४, दि.१५.०३.२०१८ |
| | | सोलापूर वन विभाग | | |
| ४ | मुख्य लेखापाल | १ | शा.नि.क्र.एफडीएम-१०८४/१८४३१/सीआर-५४/फ-२, दि.३१.५.८४ | शा.नि.क्र.एफएसटी-०४/१६/ प्र.क्र.११९/फ-४, दि.१५.०३.२०१८ |

***************